**गृहनिर्माण विभागामार्फत राज्यस्तरीय गृहनिर्माण माहिती पोर्टल** (State Housing Information Portal) (SHIP) **तयार करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२५/प्र.क्र.४५/गृनिधो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २८ एप्रिल २०२५

**वाचा :-** गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांक: प्रआयो-२०२४/प्र.क्र.८७/गृनिधो-२, दिनांक १५.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये विविध प्राधिकरणे / मंडळे / संस्था यांद्वारे तसेच विविध विभागांमार्फत घरांची निर्मिती केली जाते. यामध्ये प्रामुख्याने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा), झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण (एस.आर.ए.), महाराष्ट्र शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ मर्यादित (सिडको) व इतर मंडळे / महामंडळे यांच्यामार्फत घरांची निर्मिती करण्यात येते. तथापि, सदर घरकुलांची एकत्रित माहिती, राज्यातील घरांची प्रदेशनिहाय आवश्यकता, दरवर्षी बांधण्यात येणाऱ्या घरांची संख्या, सद्यस्थितीत रिक्त असलेली घरे, कार्यरत अथवा प्रस्तावित घरकुलांचे प्रकल्प यासदंर्भात एकत्रित माहितीचे संकलन राज्य शासनाच्या कोणत्याही विभागामार्फत केले जात नाही. तसेच, अशा प्रकारची एकत्रित माहिती उपलब्ध असणारे कोणतेही पोर्टल सद्यस्थितीत उपलब्ध नाही. त्याकरीता गृहनिर्माण विभागामार्फत राज्यस्तरीय गृहनिर्माण माहिती पोर्टल (State Housing Information Portal) (SHIP) तयार करणे आवश्यक आहे. सदर राज्यस्तरीय गृहनिर्माण माहिती पोर्टल (State Housing Information Portal) (SHIP) तयार करण्यासाठी समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील घरांची संपूर्ण अद्ययावत माहितीसाठी राज्यस्तरीय गृहनिर्माण माहिती पोर्टल (State Housing Information Portal) तयार करण्यात येत असून सदर पोर्टल तयार करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे. :-

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव (नगरविकास विभाग (नवि-१)) | सदस्य |

३. प्रधान सचिव (नगरविकास विभाग (नवि-२)) सदस्य

४. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा,मुंबई सदस्य

५. व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई सदस्य

६. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, साप्रवि सदस्य

७. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई सदस्य

८. संचालक, भारतीय प्रौद्योगिकी संस्थान मुंबई (IIT), मुंबई सदस्य

९. उप सचिव (गृहनिर्माण) (गृनिधो-२) सदस्य सचिव

२. राज्यस्तरीय गृहनिर्माण माहिती पोर्टल (State Housing Information Portal) (SHIP) मध्ये माहितीचे संकलन पुढीलप्रमाणे प्रस्तावित आहे:-




३. राज्यस्तरीय गृहनिर्माण माहिती पोर्टल (State Housing Information Portal) (SHIP) मध्ये राज्यातील इतर विभागांचे या पोर्टलशी एकत्रिकरण खालीलप्रमाणे प्रस्तावित आहे:-




४. समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे

१) सदर पोर्टल विकसित करण्याच्या अनुषंगाने त्याची व्याप्ती निश्चित करणे.
२) निविदा प्रक्रिया राबवून संस्थेची (एजन्सीची) निवड करणे.
३) पोर्टल विकसित करण्यासाठी संस्थेची (एजन्सीची) निवड करण्यासाठी निविदा अंतिम करणे.

समितीच्या अध्यक्षांना आवश्यकतेनुसार सल्लागार / तंत्रज्ञ यांचे सहाय्य घेण्यासाठी निमंत्रित करता येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०४२८१६३३५६२६०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJU GULABRAO AMBADEKAR

Digitally signed by RAJU GULABRAO AMBADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=b0ca117db55046daef08cffda987ea722840725027a3993410ac98c4bff99fbc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A0EE20C9BC84D1B68846640737AE7DE6E57C4DDDB08701C0FA67003815071B38, cn=RAJU GULABRAO AMBADEKAR
Date: 2025.04.28 16:36:16 +05'30'

**(राजु अंबाडेकर)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) अपर मुख्य सचिव (नगरविकास विभाग (नवि-१)), मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव (नगरविकास विभाग (नवि-२)), मंत्रालय, मुंबई-३२
८) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा,मुंबई
९) व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई
१०) संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, साप्रवि, मंत्रालय, मुंबई-३२.
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई
१२) संचालक, भारतीय प्रौद्योगिकी संस्थान मुंबई (IIT), मुंबई
१३) उप सचिव (गृहनिर्माण) (गृनिधो-२), मंत्रालय, मुंबई-३२
१४) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५) निवडनस्ती (गृनिधो-२)